**कोकण विभागातील जिल्हा तांत्रिक सेवा व जिल्हा सेवा वर्ग-३ मधील कर्मचाऱ्यांच्या महाराष्ट्र विकास सेवा गट-ब मध्ये तदर्थ पदोन्नती.**

# महाराष्ट्र शासन
# ग्राम विकास विभाग

**शासन आदेश क्रमांकः मविसे-१०/प्र.क्र.०५/२०१८/आस्था-३अ**

२५, मर्झबान पथ, बांधकाम भवन, मंत्रालय, मुंबई-४०० ००१

तारीख: : ११ फेब्रुवारी, २०१९.

**शासन आदेश :-**

कोकण विभागातील जिल्हा तांत्रिक सेवा व जिल्हा सेवा वर्ग-३ मधील खालील कर्मचाऱ्यांना महाराष्ट्र विकास सेवा , गट-ब संवर्गात पीबी-२ वेतनश्रेणी रुपये ९३००-३४८००+ ग्रेड वेतन ४४०० या वेतनश्रेणीत तदर्थ स्वरुपात सरळसेवा कोटयातून पदोन्नती देण्यात येत आहे. पदोन्नतीने त्यांची नेमणूक पुढीलप्रमाणे करण्यात येत आहे:-

| अ. क्र. | नाव | सध्याचे पद | निवडीने नियुक्तीनंतरचे पद व ठिकाण |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १. | श्री.पी.के. राठोड | विस्तार अधिकारी (कृषी), जिल्हा परिषद, रायगड | सहायक गट विकास अधिकारी, पंचायत समिती रोहा, जि.रायगड |
| २. | श्री.आर.टी. घावट | विस्तार अधिकारी (कृषी), जिल्हा परिषद, रत्नागिरी | सहायक गट विकास अधिकारी, पंचायत समिती खेड, जि.रत्नागिरी |
| ३. | श्री.एन.एन. पवार | सहा.पशुधन विकास अधिकारी, जिल्हा परिषद, सिंधुदूर्ग | सहायक गट विकास अधिकारी, (मनरेगा), जि.रत्नागिरी |
| ४. | श्रीमती पी.ए. भागवत | विस्तार अधिकारी (शिक्षण), जिल्हा परिषद, ठाणे | सहायक प्रकल्प अधिकारी (संनि.), जि.ग्रा.वि.यं. जि.पालघर |
| ५. | श्री.बी.एच. राठोड | कक्ष अधिकारी, जिल्हा परिषद, ठाणे | सहायक गट विकास अधिकारी, पंचायत समिती डहाणू, जि.पालघर |
| ६. | श्री.एस.एस.यमगर | कक्ष अधिकारी, जिल्हा परिषद, रायगड | सहायक गट विकास अधिकारी, पंचायत समिती महाड, जि.रायगड |

| अ. क्र. | नाव | सध्याचे पद | निवडीने नियुक्तीनंतरचे पद व ठिकाण |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| ७. | श्री.सी.आर. तांडेल | विस्तार अधिकारी (सांख्यिकी), जिल्हा परिषद, रायगड | सहायक गट विकास अधिकारी, पंचायत समिती संगमेश्वर, जि.रत्नागिरी |
| ८. | श्री.ए.एस. चव्हाण | विस्तार अधिकारी (पं.), जिल्हा परिषद, सिंधुदूर्ग | सहायक गट विकास अधिकारी, पंचायत समिती देवगड, जि.सिंधुदूर्ग |
| ९. | श्री.एम.एम. बेहरे | विस्तार अधिकारी (पं.), जिल्हा परिषद, सिंधुदूर्ग | सहायक गट विकास अधिकारी, पंचायत समिती दोडामार्ग, जि.सिंधुदूर्ग |
| १० | श्री.एम.एन. गढरी | विस्तार अधिकारी (पं.), जिल्हा परिषद, रत्नागिरी | सहायक गट विकास अधिकारी, पंचायत समिती पेण, जि.रायगड |
| ११. | श्री.एस.आर. चव्हाण | विस्तार अधिकारी (पं.), जिल्हा परिषद, सिंधुदूर्ग | सहायक गट विकास अधिकारी, पंचायत समिती मालवण, जि.सिंधुदूर्ग |

२. मा. उच्च न्यायालय, मुंबई यांनी याचिका क्र.२७९७/२०१५ मध्ये दि.०४.०८.२०१७ रोजी दिलेल्या निर्णयान्वये पदोन्नतीमधील आरक्षण अवैध ठरविले आहे. मा. उच्च न्यायालयाच्या विरोधात राज्य शासनाने मा. सर्वोच्च न्यायालयात विशेष अनुज्ञा याचिका क्र.२८३०६/२०१७ दाखल केली आहे. सदर याचिका अद्यापि प्रलंबित आहे. याबाबत विधी व न्याय विभागाने दि.२८.१२.२०१७ रोजी दिलेल्या अभिप्रायानुसार खुल्या प्रवर्गातील कर्मचाऱ्यांना पदोन्नती देण्यास कोणतीही वैधानिक अडचण नसल्याचे अभिप्राय दिले आहेत. त्यानुसार तूर्तास पदोन्नतीच्या कोट्यातील खुल्या प्रवर्गातील रिक्त पदे निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात सेवाज्येष्ठतेनुसार मा.सर्वोच्च न्यायालयाच्या निर्णयाच्या अधीन राहून भरण्यात यावीत. अशी कार्यवाही करताना सेवाज्येष्ठता यादीमधील मागासवर्गीय अधिकारी/कर्मचारी यांना पदोन्नती देण्यापूर्वी ते दि.२५.०५.२००४ च्या शासन निर्णयातील तरतुदीनुसार आरक्षणाचा लाभ मिळून सेवाज्येष्ठता यादीत वरच्या स्थानावर आले नाहीत, याची खात्री प्रत्येक प्रशासकीय विभागाने करावी अशा सूचना सा.प्र.वि./का.१६ ब ने दि.२९.१२.२०१७ च्या पत्रान्वये दिल्या आहेत.

त्यानुसार सदर अधिकाऱ्यांची सहायक गट विकास अधिकारी पदावरील तदर्थ पदोन्नती मा. सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्र.२८३०६/२०१७ च्या अधीन असून पदोन्नतीच्या कोट्यातील खुल्या प्रवर्गातील रिक्त पदावर निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात देण्यात येत आहे. वरील कर्मचाऱ्यांना सरळसेवेच्या कोटयातून तात्पुरत्या स्वरुपात तदर्थ पदोन्नतीने देण्यांत आलेली नियुक्ती ही खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे. :-

अ) सदर तदर्थ पदोन्नती ११ महिने अथवा आयोग पुरस्कृत उमेदवार उपलब्ध होतील यापैकी जे आधी घडेल तो पर्यंत राहिल. दरम्यानच्या काळात आयोग पुरस्कृत उमेदवार प्राप्त झाल्यास, तदर्थ पदोन्नती झालेल्या अधिकाऱ्यांना पदावनत करण्यांत येईल. सदर पदोन्नती तात्पुरत्या स्वरुपात असून सदर पदावर संबंधित अधिकाऱ्याचा कायम स्वरुपी धारणाधिकार राहणार नाही.

ब) सदर तदर्थ पदोन्नती सरळसेवेच्या कोटयातील पदावर देण्यांत येत असल्याने ती तात्पुरत्या स्वरुपाची असून, महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या मान्यतेच्या अधिन राहून देण्यांत येत आहे.

क) सदर तदर्थ पदोन्नती ही संबंधित अधिकाऱ्यांनी महाराष्ट्र विकास सेवा,विभागीय परीक्षा १९९१ व सुधारणा नियम १९९८ मधील तरतूदीनुसार विहित मुदतीत परीक्षा उत्तीर्ण होण्याच्या अधीन राहून देण्यांत येत आहे, अन्यथा ते पदावनतीस पात्र ठरतील.

ड) सदर अधिकाऱ्यांविरुद्ध आदेशाच्या दिनांकापर्यंत कोणत्याही प्रकारची विभागीय चौकशी सुरु झालेली नाही.

इ) प्रतिनियुक्तीवर असलेले ज्येष्ठ अधिकारी यांचे प्रत्यावर्तन झाल्यानंतर त्यांच्यासाठी सहायक गट विकास अधिकारी संवर्गात रिक्त पद उपलब्ध नसल्यास या आदेशातील कनिष्ठतम अधिकाऱ्याला पदावनत करण्याच्या अधीन सदर तदर्थ पदोन्नत्या देण्यात येत आहेत.

ई) या तदर्थ पदोन्नतीमुळे संबंधित अधिकाऱ्यांना नियमित पदोन्नतीचे म्हणजेच ज्येष्ठतेचे कोणतेही हक्क प्राप्त होणार नाहीत.

फ) मागास प्रवर्गातील अधिकाऱ्यांची पदोन्नती सदर अधिकाऱ्यांचे जातवैधता प्रमाणपत्र संबंधित जात पडताळणी समितीने निर्गमित केले आहे या अटीच्या अधीन राहून करण्यात येत आहे.

३. सदर सहायक गट विकास अधिकारी पदावरील पदोन्नती मा. उच्च न्यायालयात दाखल केलेल्या याचिका क्र.२९८२/२०००, २९८६/२००० व ४९५८/२००३ तसेच महाराष्ट्र प्रशासकीय

न्यायाधिकरण , मुंबई येथे दाखल केलेल्या मूळ अर्ज क्र.५१२/२०१७ च्या अंतिम निकालाच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

४. हे आदेश तात्काळ अंमलात येतील. पदोन्नत झालेल्या अधिकाऱ्याला संबंधित विभागीय आयुक्त/ मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांनी तात्काळ कार्यमुक्त करावे. तसेच संबंधित कर्मचाऱ्यांनी पदभार स्वीकारल्यानंतर त्याचा अहवाल शासनास सादर करावा.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०२१११५५६२६०५२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Rajendra Natha Savane

Digitally signed by Rajendra Natha Savane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Rural Development And Water Conservation Department, postalCode=400001, st=Maharashtra,
2.5.4.20=0a2ac5ab6ca0075cc776c90ec03925f2eb8727640eacf311beb6f68d63939303, serialNumber=f049989dbbef93340e9edd88af960a0963746d42baa5c948405b62e821529a99, cn=Rajendra Natha Savane
Date: 2019.02.12 11:06:07 +05'30'

**(रा.ना.सवने)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) मंत्री (ग्रामविकास) यांचे खाजगी सचिव.
२) मा.राज्यमंत्री (ग्रामविकास) यांचे खाजगी सचिव.
३) मा.अप्पर मुख्य मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
४) मा. प्रधान सचिव (ग्रामविकास व पंचायत राज) यांचे स्वीय सहायक.
५) मा. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई.
६) महालेखापाल-१, (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई.
७) विभागीय आयुक्त, कोकण विभाग.
८) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, रायगड, सिंधुदुर्ग, रत्नागिरी, ठाणे, पालघर.
९) मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद, रायगड, सिंधुदुर्ग, रत्नागिरी, ठाणे, पालघर
१०) संबंधित अधिकारी (द्वारा संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद)
११) कार्या. आस्था-२, आस्था-३, ग्रामविकास विभाग.
१२) निवडनस्ती.